2012010705564714700l

**भाडेपटटयाने वा कब्जेहक्काने प्रदान केलेल्या शासकीय जमिनी कर्ज उभारण्यासाठी वित्तीय संस्थांकडे तारण ठेवण्यास, परवानगी देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : जमीन ११/२०११/प्र.क्र.१६६/ज-१**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२**
**दिनांक : २ जानेवारी, २०१२**

**वाचा :** शासन निर्णय क्रमांक : जमीन २०००/प्र.क्र.१३५/ज-१, दि.२७ फेब्रुवारी, २००९.

**प्रस्तावना :-**

सेवाभावी संस्था, व्यक्ती आणि विविध संस्था, कंपन्या इत्यादी यांना महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीचे वितरण) नियम १९७१ अन्वये विविध प्रयोजनासाठी शासकीय जमिनी कब्जेहक्काने भोगवटादार वर्ग-२ अथवा भाडेपट्याने प्रचलित धोरणानुसार विहीत अटी व शर्तीवर मंजूर केल्या जातात. अशा प्रकारे मंजूर करण्यात आलेल्या शासकीय जमिनी मंजूर प्रयोजनासाठी विकसित करण्याकरिता वित्तिय संस्थांकडून कर्ज उभारणीसाठी, वित्तिय संस्थांकडे गहाण / तारण ठेवताना कर्जाच्या रकमेवर विहीत दराने तारणशुल्क (Mortgage Fee)आकारुन, तारण ठेवण्यास परवानगी देण्याचा निर्णय दि.२७.२.२००९ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे.प्रत्यक्षात शासनाने मंजूर केलेल्या जमिनीसह, संस्थेने स्वतः संपादीत केलेली जमीन तसेच जमिनीवर संस्थेने उभारलेली इमारत, यंत्रसामुग्री इत्यादी मालमत्तादेखील तारण ठेवून वित्तीय संस्थांकडून कर्ज घेण्यात येते. अशा प्रकारे कर्ज उभारतांना सदर व्यक्ती, संस्था स्वतःच्या मालमत्तेसह शासनाने मंजूर केलेली जमीन अनुषांगिक प्रतिभूती म्हणून तारण ठेवीत असते. प्रत्यक्षात एखाद्या प्रयोजनासाठी जमीन मंजूर केल्यानंतर त्या प्रयोजनाच्या विकासासाठी तसेच विस्तारासाठी कर्जउभारणी करताना संबंधित प्रयोजनासाठी मंजूर केलेल्या शासकीय जमीनसह, संबंधित संस्थेने स्वतः संपादीत केलेली जमीन, तसेच जमिनीवर उभी असलेली इमारत, यंत्रसामुग्री व संस्थेची अन्य मालमत्ता इत्यादीतारण ठेवून वित्तीय संस्थांकडून कर्ज मंजूर केले जाते. वरील सर्व घटकांचा एकत्रित विचार करून तारणशुल्क कर्जाच्या रकमेवर आकारण्यात यावे अथवा जेवढी शासकीय जमीन वित्तीय संस्थेकडे तारण ठेवली

जाते त्या जमीनीच्या प्रचलित बाजारमूल्यावर तारणशुल्क आकारण्यात यावे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती .त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहेः-

शासन निर्णय :-

(१) तारणशुल्काचे दर प्रयोजनानुसार संदर्भाधीन दिनांक २७.०२.२००९ च्या शासन निर्णयातील दरांप्रमाणे राहतील.

(२) शासकीय जमीन तारण ठेवल्यास आकारवयाचे तारणशुल्क हे घेतलेल्या कर्जाच्या रकमेच्या किंवा जेवढी शासकीय जमीन तारण ठेवण्यात आली असेल त्या शासकीय जमीनीच्या प्रचलित बाजारभावानुसार येणारी क्रिंमत या दोन्हीपैकी जी रक्कम कमी असेल त्या रकमेवर आकारण्यात यावे.

(३) जमीन तारण ठेवण्यास परवानगी देताना संदर्भाधीन दिनांक २७.०२.२००९ च्या शासन निर्णयातील अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सुनिल कोठेकर)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त
जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपविभागीय अधिकारी / सर्व तहसिलदार
मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
प्रधान सचिव (महसूल), याचे स्विय सहायक, महसूल व वन विभाग, मुंबई-३२
महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
सर्व मंत्रालय विभाग
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
"ज" समुहातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
ज-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती)

----------